कृषि आयुक्तालयाच्या अंतर्गत किडनाशक उर्वरित अंश तपासणी प्रयोगशाळा प्रशासकीय व वित्तीय मान्यता सन २००९-१०

महाराष्ट्र शासन

कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,

शासन निर्णय क्रमांक :किनाप्र २००८/प्र.क्र. ९२ /१४ अे

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ० ३२.

दिनांक : ३१ ऑगस्ट,२००९.

वाचा :

१) कृषि मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे कडील पत्र क्र.६-६/२००९/एमएम दिनांक ३० जून,२००९.

२) कृषि व पदुम विभाग, पत्र क्रमांक केंपुयो १००८/प्रक्र.५४/२-अे, दि. ९-७-२००९

३) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/गु.नि.६/१९०६/३४८/२००९, दि..३.८.२००९

**प्रस्तावना :-**

कृषि आयुक्तालयाच्या अधिनस्त पुणे व नागपूर येथे कार्यरत असलेल्या प्रयोगशाळांचे अत्याधुनिक उपकरणांद्वारे किडनाशक उर्वरित अंश तपासणी प्रयोगशाळा स्थापन करणे ही १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना राज्यात सन २०००-०१ पासून राबविण्यात येत आहे. आंतरराष्ट्रीय शेती कराराच्या अनुषंगाने राज्यातील कृषि मालाला प्राप्त झालेल्या निर्यातीच्या संधीच्या पार्श्वभूमीवर सध्या पुणे व नागपूर येथील प्रयोगशाळांचे आधुनिक उपकरणे व तंत्रज्ञानाद्वारे बळकटीकरण वेळोवेळी करणे आवश्यक आहे. या वस्तुस्थितीचा विचार करता सध्या अस्तित्वात असलेल्या पुणे व नागपूर येथील किडनाशक उर्वरित अंश चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नागपूर व पुणे येथील किडनाशक उर्वरित अंश चाचणी प्रयोगशाळांचे नवीन तंत्रज्ञानयुक्त उपकरणांनी आधुनिकीकरण व बळकटीकरण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. तसेच सन२००९-१० या आर्थिक वर्षात रु. ५८.९० लाख ( रुपये अठ्ठावन लाख फक्त ) एवढया निधीकरिता प्रशासकीय मान्यता व निधी खर्च करण्यास शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. सदर निधीचा विनियोग पुणे व नागपूर येथील प्रयोगशाळेस केंद्र शासनाने मान्यता दिलेल्या अद्ययावत उपकरणांची खरेदी, बळकटीकरण व प्रशिक्षण या उद्दिष्टांसाठी करावयाचा आहे. या मंजूरीच्या अनुषंगाने करावयाची कार्यवाही ही केंद्रिय कृषि मंत्रालयाने दिलेल्या मार्गदर्शक सूचना व तत्वे, शासनाचे विहित नियम व अटी, वेळोवेळी जाहीर केलेली होणारी बंधने, मार्गदर्शक सूचना व कार्यपध्दती यांचा अवलंब करुन करण्यात यावी. व याबाबतचा निधी विनियोगाचा अहवाल केंद्र व राज्य शासनास वेळोवेळी देण्यात यावा.

२. किडनाशक उर्वरित अंश चाचणी प्रयोगशाळेची उभारणी करण्यासाठीची योजना १०० टक्के केंद्र पुरस्कृत असून, या योजने अंतर्गत मंजूर निधीकरिता आयुक्त ( कृषि ) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच त्यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून देखिल घोषित करण्यात येत आहे. या योजनेचा खर्च वित्त विभागाच्या दिनांक २०/४/२००६ च्या परिपत्रकानुसार मासिक कॅश फ्लोच्या मर्यादेत राहील याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबधित नियंत्रक अधिकाऱ्यांची राहील.

कृ.मा.प..

या योजने अंतर्गतच्या घटकांपित्यर्थचा सन २००९-२०१० या आर्थिक वर्षातील खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा :-

मागणी क्र. डी-३
२४०१-पिक संवर्धन,
११९-बागायती व भाजीपाला पिके
११९ (०३) रोपमळे
(०३)(१३) किडनाशक अंश तपासणी प्रयोगशाळेची स्थापना व बळकटीकरण
(१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना)
३३ अर्थसहाय्य ( २४०१ ४१६ ९ )

३. हे आदेश वित्त विभागाच्या परिपत्रक क्र. खर्चाने १००६/प्र.क्र.१/अर्थोपाय दिनांक २०/४/२००६ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारानुसार प्रधान सचिव ( कृषि ) यांच्या मान्यतेने निर्गमीत करण्यात येत आहेत.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्यांचा संगणक सांकेतांक २००९०८२६१४४२४५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( स. ह. भोसले )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

प्रति,

आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
फलोत्पादन संचालक , महाराष्ट्र राज्य, पुणे ,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, मुंबई ,
संचालक ( नि व गु नि ) कृषि आयुक्तालय, पुणे,
सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय), महाराष्ट्र राज्य, पुणे व नागपूर
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
सहाय्यक संचालक ( लेखा ) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे ,
सर्व जिल्हा कृषि अधिक्षक अधिकारी,
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, नागपूर ,
विभागीय कृषी सहसंचालक, औरंगाबाद ,
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) महाराष्ट्र १/२,मुंबई/नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई .
वित्त विभाग (व्यय-१/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई -३२ ,
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई -३२,
सर्व सह सचिव, उप सचिव, अवर सचिव (कृषि विभाग) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय ,
मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव ,
मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव ,
कार्यासन २-अ, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ ,
निवडनस्ती ( १४ अे ).